सन २०१८-१९ छत्रपती शिवाजी चषक राज्यस्तरीय कबड्डी क्रीडा स्पर्धा आयोजनासाठी निधी वितरित करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## शालेय शिक्षण व क्रीडा विभाग
## शासन निर्णय क्रमांक : निविप्र ४०१८/प्र.क्र.१७२/क्रीयुसे -२

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख : ०४ डिसेंबर, २०१८.

**वाचा**

१. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग शासन निर्णय क्र. क्रीस्पर्धा२०१२/प्र. क्र. २२९/१२/क्रीयुसे-२, दि. ३ नोव्हेंबर, २०१२.

२. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग शासन निर्णय क्र. निविप्र ४०१८ /प्र.क्र.१७२ /क्रीयुसे -२, दि. १४ स्पटेंबर,२०१८.

**प्रस्तावना -**

राज्याचे क्रीडा धोरण २०१२ मधील मुद्दा क्रमांक ५.४ नुसार राज्यातील कबड्डी खेळाडूंना प्रोत्साहन मिळावे व त्यांना राज्यस्तरीय स्पर्धेत खेळण्याची जास्तीत जास्त संधी प्राप्त व्हावी, तसेच राज्यातील क्रीडा प्रेमी प्रेक्षकांना दर्जेदार खेळाडूंचे कौशल्य पहावयास मिळावे, यासाठी महाराष्ट्र शासनातर्फे राज्यस्तरावर दरवर्षी छत्रपती शिवाजी चषक कबड्डी स्पर्धेचे आयोजन करण्यात येते. उपरोक्त स्पर्धा आयोजनाबाबत संदर्भ क्र.०१ च्या शासन निर्णयान्वये नियमावाली ठरविण्यात आली असून छत्रपती शिवाजी चषक कबड्डी स्पर्धा आयोजनासाठी बाब निहाय खर्च निश्चित करण्यात आला आहे. सदर खर्च “ २२०४ क्रीडा व युवक सेवा, १०४ क्रीडा व खेळ, (३१)(०१) छत्रपती शिवाजी चषक राज्यस्तरीय कबड्डी स्पर्धा (२२०४ २०४६) “ या लेखाशीर्षाखाली अर्थसंकल्पीत निधीतून भागविण्यात येतो.

संदर्भ क्र. २ च्या शासन निर्णयातील तरतूदींनुसार, सन २०१८-१९ या वर्षामध्ये छत्रपती शिवाजी राज्यस्तरीय कबड्डी या स्पर्धा आयोजनासाठी रु. ५०.०० लक्ष इतका निधी अर्थसंकल्पित असून यापैकी रु.३५.०० लक्ष (७० टक्केच्या मर्यादेत) इतका निधी वितरीत करण्यात आला आहे. सदर योजनेसाठी उर्वरीत निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०१८-१९ या वर्षा मध्ये छत्रपती शिवाजी महाराज चषक राज्यस्तरीय कबड्डी या स्पर्धाचे आयोजन करण्यारीता २२०४-क्रीडा व युवक सेवा-१०४-क्रीडा व खेळ,(३१) कबड्डी चषक (३१) (०१) छत्रपती शिवाजी चषक राज्यस्तरीय कबड्डी क्रीडा स्पर्धा (२२०४ २०४६) ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशीर्षांतर्गत एकूण अर्थसंकल्पित निधीतून रु.१५.०० लक्ष (रुपये पंधरा लाख फक्त) इतकी रक्कम वितरित करण्यास व सदर रक्कम आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांच्या अधिनस्त ठेवण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. सदरचे अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहेत त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावे. उपरोक्त स्पर्धा आयोजनासाठी वाढीव अनुदान देण्याबाबत संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयामधील अटी व शर्ती लागू राहतील.

३. वित्त विभाग दिनांक ०२.०४.२०१८ च्या परिपत्रकातील सूचनानुसार उपरोक्त तरतुद खर्च करण्याबाबतची कार्यवाही करण्यात यावी. यासाठी संबंधीत जिल्हा क्रीडा अधिकारी/उपसंचालक यांना आंहरण व संवितरण अधिकारी तर आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या दिनांक ०२.०४.२०१८ च्या परिपत्रकातील सूचनांना अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे. सदर परिपत्रकाच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ८ मध्ये नमूद अटींची पूर्तता होत आहे. सदर परिपत्रकाच्या परिशिष्टातील मुद्दा क्र.१, २, ३, ४, ५, ६ व ७ मधील बाबी सदर आदेशास लागू नाहीत.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१२०४१३०९३५०८२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajendra Shankarrao Pawar

Digitally signed by Rajendra Shankarrao Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education and Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=679184b88f7019ef64ad6ddc2495ca280267c0d4755ce63fa70c45cf755d9373, cn=Rajendra Shankarrao Pawar
Date: 2018.12.04 13:17:09 +05'30'

**( राजेंद्र पवार )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१.मा.राज्यपाल तथा अध्यक्ष, आंतरविद्यापीठ क्रीडा महोत्सव आयोजन समिती, मुंबई.
२.मा.मंत्री, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३.मा.विरोधी पक्षनेता (विधानसभा / विधानपरिषद) यांचे स्वीय सहायक, मुंबई.
४. सर्व विधानसभा / विधानपरिषद सदस्य यांचे स्वीय सहायक.
५. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
६. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे,
७. महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर,
८. महालेखापाल (लेखा), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर
९. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई. (क्रीडा संचालनालयामार्फत)
१०. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी (क्रीडा संचालनालयामार्फत)
११. वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे. (क्रीडा संचालनालयामार्फत)
१२. लेखाधिकारी, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे, (क्रीडा संचालनालयामार्फत)
१३. सर्व उपसंचालक व जिल्हा क्रीडा अधिकारी (क्रीडा संचालनालयामार्फत),
१४. वित्त विभाग (व्यय-५)/अर्थ-८/नियोजन विभाग (का.१४७१), मंत्रालय, मुंबई,
१५. कार्यासन अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१६. निवड नस्ती (क्रीयुसे-२)